जागतिक बँक अर्थसहाय्यित राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पाच्या सुधारित आराखड्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ फेब्रुवारी, २०२२

वाचा :-

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५, दिनांक २९/०१/२०१८
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५, दिनांक २४/०८/२०१८
३) **संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांकः** जा.क्र.पंजिका-नियोजन/ अधि-कार्या.इमा.बां.दे.दु.खर्च मं/प्र.क्र.२०/२०१४९, दिनांक १०/१०/२०१९
४) **केंद्र शासनाच्या जल संधारण, नदी विकास आणि गंगा संरक्षण विभागाचे पत्र क्रमांकः** X-95014/1/2017/NHP/3812-3912, dated 04/07/2019
५) **केंद्र शासनाच्या जल संधारण, नदी विकास आणि गंगा संरक्षण विभागाचे पत्र क्रमांकः** X-60029/1/2017-NHP Section/33/-338, dated 10/01/2020
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५, दिनांक १०/११/२०२०
७) केंद्र शासनाच्या जल संधारण, नदी विकास आणि गंगा संरक्षण विभागाचे पत्र क्रमांकः X-60029/1/2017-NHP 2924, dated 01/12/2021

प्रस्तावना :-

जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने केंद्र शासनामार्फत जलविज्ञान प्रकल्प राबविण्यात येत असून, या प्रकल्पांतर्गत राज्यात भूजलाच्या बाबतीत भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमार्फत विविध विकास कामे हाती घेण्यात आलेली आहेत. या प्रकल्पाच्या रू. २७ कोटीच्या आराखड्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता शासन निर्णय दिनांक १०/११/२०२० अन्वये देण्यात आली आहे. या आराखड्यातील ३ घटकांच्या सुधारीत खर्चास/अंदाजास केंद्र शासनाने दिनांक १/१२/२०२१ रोजीच्या पत्रान्वये सहमती दिलेली आहे. त्यास अनुसरून सुधारीत अंमलबजावणी आराखड्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

दि. १०/११/२०२० च्या शासन निर्णयात नमूद बाबीपैकी खालील बाबींच्या केंद्र शासनाने मंजूर केलेल्या सुधारित अंमलबजावणी आराखड्यास आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पाच्या रक्कम रु. २७.०० कोटी (रुपये सत्तावीस कोटी) किंमतीच्या मर्यादेत उक्त शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | UID | PIP Code | विवरण | दिनांक १०.११.२०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार सुधारित किंमत (रुपये लाखात) | केंद्र शासनाच्या दिनांक १.१२.२०२१ रोजीच्या शासन पत्रानुसार सुधारित किंमत (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 3075 | A3.1.01<br>A3.3.01 | A) Construction of Annex Building for State Groundwater Informatics and Modeling Centre<br>B) Furnishing of Annex Building for State Groundwater Informatics and Modeling Centre<br>C) Strengthening and Furnishing of Existing Building of SPMU | 800.00 | **1074.00** |
| 2 | 3090 | D1.7.01 | Procurement of Vehicles, | 200.00 | 80.00 |
| 3 | 5019 | D3.2.01 | Operational Cost of SPMU | 254.20 | 100.20 |

**उर्वरीत घटकांचा अंदाजित खर्च दिनांक १० नोव्हेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार व केंद्र शासनाच्या दिनांक १ डिसेंबर, २०२१ रोजीच्या पत्रानुसार विहीत राहील.**

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २५३/१४४३, दिनांक २९/१२/२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६/व्यय-३, दिनांक १७/०१/२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१११७०२१८४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.02.11 17:11:55 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, गो.ते.रूग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-०१
४. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजी नगर, पुणे
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
६. उपसंचालक, राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्प, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने
८. निवड नस्ती, कार्यासन (पापु-१५)